**महाराष्ट्र शिक्षण सेवा (प्रशासन शाखा) मधील शिक्षणाधिकारी व तत्सम, गट-अ व प्रशासन अधिकारी, गट-अ या पदांचे संवर्ग एकत्रिकरण तसेच महाराष्ट्र शिक्षण सेवा (प्रशासन शाखा) मधील उपशिक्षणाधिकारी व तत्सम, गट ब व अधीक्षक, महाराष्ट्र शिक्षण सेवा गट-ब या दोन पदांचे संवर्ग एकत्रिकरण करणेबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक: सेप्रनि-४७१७/प्र.क्र.६५/प्रशा-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: २० नोव्हेंबर,२०१९

वाचा : १. शिक्षण क्रीडा व समाज कल्याण विभाग शा.निर्णय क्र. एफएएस-२३६६-डी, दिनांक ०७.०९.१९७१
२.शिक्षण आणि सेवायोजन विभाग अधिसूचना क्र.एसएओ-१०७८/१५७५१०/(९५५)/(ii)/ADM-२, दिनांक २३.१२.१९८८.
३. शालेय शिक्षण व क्रीडा विभाग अधिसूचना क्र.सेप्रनि-४७१६/प्र.क्र.१३/प्रशा-२, दिनांक ०५.०७.२०१६
४. शालेय शिक्षण व क्रीडा विभाग अधिसूचना क्र.सेप्रनि-४७१६/प्र.क्र.१३/प्रशा-२, दिनांक ०५.०७.२०१६

**प्रस्तावना :**

शालेय शिक्षण विभागामध्ये प्रामुख्याने दोन शाखा असून, ते १) प्रशासन शाखा व २) शिक्षण सक्षमीकरण शाखा (प्रशिक्षण शाखा) या नावाने कार्यरत आहेत. प्रशासन शाखेमध्ये दोन पदोन्नती साखळया दिसून येत आहेत. त्यापैकी एका पदोन्नती साखळीमध्ये शिक्षण संचालक ते उपशिक्षणाधिकारी ही पदे आहेत व या पदांच्या साखळीसाठी शैक्षणिक अर्हता ही बी. एड. अशी होती. तसेच प्रशासन शाखेमधील दुसऱ्या साखळीमध्ये अधिक्षक, सामान्य राज्य सेवा, अधिक्षक, महाराष्ट्र शिक्षण सेवा व प्रशासन अधिकारी ही पदे आहेत. सदर साखळीसाठी शैक्षणिक अर्हता ही कोणत्याही शाखेची पदवी अशी होती. मात्र, शिक्षण संचालक ते उपशिक्षणाधिकारी या प्रशासन शाखेमधील साखळीसाठी असलेली बी. एड. ही शैक्षणिक अर्हता वगळण्यात आली आहे व कोणत्याही शाखेची पदवी अशी शैक्षणिक अर्हता विहित करण्यात आल्यामुळे प्रशासन शाखेमध्ये दोन पदोन्नती साखळीऐवजी एकच पदोन्नतीची साखळी करणे आवश्यक आहे.

२. शालेय शिक्षण व क्रीडा विभागांतर्गत महाराष्ट्र शिक्षण सेवा (प्रशासन शाखा) मधील शिक्षणाधिकारी व तत्सम, गट-अ व प्रशासन अधिकारी गट-अ पदाची ६ व्या वेतन आयोगातील वेतनश्रेणी (वेतन बँड रु. १५६००-३९१०० अधिक ग्रेड वेतन रु. ५४०० अशी) एकच आहे. सबब, सदरचे शिक्षणाधिकारी व तत्सम पदांमध्ये प्रशासन अधिकारी हा संवर्ग समाविष्ट करण्यास नियुक्ती प्राधिकारी या नात्याने तत्कालीन मा. मंत्री (शालेय शिक्षण) यांनी मान्यता दिली आहे.

३. तसेच, शालेय शिक्षण व क्रीडा विभागांतर्गत महाराष्ट्र शिक्षण सेवा (प्रशासन शाखा) मधील उपशिक्षणाधिकारी व तत्सम, गट-ब व अधिक्षक (महाराष्ट्र शिक्षण सेवा) गट-ब पदाची सहाव्या वेतन आयोगातील वेतनश्रेणी (वेतन बँड रु. वेतन बँड रु. ९३००-३४८०० अधिक ग्रेड वेतन रु. ४८०० अशी) एकच आहे. सबब, उपशिक्षणाधिकारी व तत्सम पदांमध्ये अधिक्षक (महाराष्ट्र शिक्षण सेवा) हा संवर्ग समाविष्ठ करण्यास नियुक्ती प्राधिकारी या नात्याने तत्कालीन मा मंत्री (शा.शि) यांनी मान्यता दिलेली आहे.

**शासन निर्णय** :

महाराष्ट्र शिक्षण सेवा (प्रशासन शाखा) मधील शिक्षणाधिकारी व तत्सम, गट-अ व प्रशासन अधिकारी, गट-अ या पदांचे संवर्ग एकत्रिकरण करण्यास मान्यता देण्यात येत आहे. यासाठी महाराष्ट्र शिक्षण सेवा (प्रशासन शाखा) गट-अ पदाच्या सेवा प्रवेश नियमात आवश्यक ते बदल यथावकाश करण्यात येतील.

२. तसेच, महाराष्ट्र शिक्षण सेवा (प्रशासन शाखा) मधील उपशिक्षणाधिकारी व तत्सम, गट ब व अधिक्षक (महाराष्ट्र शिक्षण सेवा) गट-ब या दोन पदांचे संवर्ग एकत्रिकरण करण्यास मान्यता देण्यात येत आहे. सदर पदाच्या सेवा प्रवेश नियमात आवश्यक ते बदल यथावकाश करण्यात येतील.

३. हा शासन निर्णय सामान्य प्रशासन विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. १४४०/१७/का-१२, दिनांक ३०.११.२०१७ व वित्त अनौपचारीक संदर्भ क्र. ३९५/१९/आपुक, दिनांक १४.०८.२०१९ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाला www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्र. २०१९११२०१७१८५५५७२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने ,

SUSHIL KHODWEKAR

Digitally signed by SUSHIL KHODWEKAR
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=1c4a8f0aafeac0a009d462f7f02d23942001d76225b9f704de26731171c8684b, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=19b0ccbee5810aa5e36e9fa467a7630471d3c500ceb353fbb37bf0b6dfe0407a, ou=SCHOOL EDUCATION AND SPORT DEPT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=SUSHIL KHODWEKAR
Date: 2019.11.20 17:26:16 +05'30'

**(सुशील खोडवेकर)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१.अपर मुख्य सचिव (सेवा) सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
२. अपर मुख्य सचिव (वित्त) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
४.प्रधान सचिव (लेखा व कोषागारे) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राने)
६. आयुक्त (शिक्षण) महाराष्ट्र राज्य, पुणे.
७ सर्व शिक्षण संचालक/ सहसंचालक/ विभागीय शिक्षण उप संचालक/शिक्षणाधिकारी
८. सर्व सह सचिव/उप सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग.
९. अवर सचिव (कार्यासन प्रशा-३/कार्यासन-५) १० निवड नस्ती (प्रशा-२)